"कायम विनाअनुदान" तत्वावर परवानगी दिलेल्या व अनुदानास पात्र घोषित केलेल्या मान्यताप्राप्त खाजगी व स्वयंसेवी संस्थांच्या ३ सैनिकी शाळेतील १८ अतिरिक्त तुकडयांवरील ३६ शिक्षक पदांना अनुदान मंजूरीसाठी निधी वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ईसैशा-२०१८/प्र.क्र.१०२/एसएम-६,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १९ ऑक्टोबर, २०१८.

**वाचा :-** (१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:-ईसैश-१०९५/(२७८/९५)/माशि-७, दिनांक २६ सप्टेंबर, १९९५,
(२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:- माशाअ- २००९/५९९/०९/माशि-१, दिनांक २० जुलै, २००९,
(३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:-माशाअ- २००९/५९९/०९/माशि-१, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११,
(४) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:- संकीर्ण-२०१२/प्र.क्र.१५०/१२/माशि-१, दिनांक १६ जूलै, २०१३,
(५) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:- ईसैशा-२०१४/प्र.क्र.१४५/१४/एमएम-६, दिनांक ९ ऑक्टोबर,२०१५,
(६) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:- ईसैशा-२०१७/प्र.क्र.३६/१७/एमएम-६, दिनांक १० सप्टेंबर,२०१५,
(७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:- ईसैशा-२०१७/प्र.क्र.३६/१७/एमएम-६, दिनांक १२ मे,२०१६
(८) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:- ईसैशा-२०१७/प्र.क्र.३६/१७/एमएम-६, दिनांक ७ .६.२०१८

**प्रस्तावना :-**

राज्यातील जास्तीत जास्त विद्यार्थी राष्ट्रीय संरक्षरण प्रबोधिनी (NDA) च्या स्पर्धात्मक परीक्षेत प्रविष्ट होऊन सैन्यदलात भरती व्हावेत व देशाची सेवा करावी व त्याचबरोबर शिस्तप्रिय, आत्मविश्वास पूर्ण सांघिक वृत्ती बाणवून, नेतृत्वभिमुख सैनिक शिक्षणाची सोय माध्यमिक स्तरावर उपलब्ध व्हावी यासाठी सक्षम व स्वयंसेवी संस्थांना राज्यात प्रत्येक जिल्हयात एक अशा सैनिकी शिक्षण देणाऱ्या तीस शाळा सुरु करण्यास व या अनुषंगाने इयत्ता ५ वी च्या स्तरावरुन ४० विदयार्थ्यांची एक तुकडी सन १९९६-९७ पासून १००% अनुदानावर सुरु करण्यास शासन निर्णय, दिनांक २६ सप्टेंबर, १९९५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

२. राज्यातील कायम विना अनुदान तत्वावर मान्यता दिलेल्या व कायम शब्द वगळलेल्या शासन मान्यता प्राप्त खाजगी प्राथमिक व माध्यमिक शाळांच्या मूल्यांकना संदर्भात निकष, संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक १५

नोव्हेंबर, २०११ आणि दिनांक १६ जुलै, २०१३ अन्वये विहित करण्यात आले आहेत. सदर निकष पूर्ण करणाऱ्या इयत्ता ५ वी ते १० वी च्या ६ अतिरिक्त तुकडया या प्रमाणे ३ सैनिक शाळांमधील एकूण १८ तुकडयांवरील ३६ शिक्षक पदांना संदर्भाधीन दिनांक १० सप्टेंबर, २०१५, दिनांक १२ मे, २०१६ दिनांक ११ मे, २०१७ च्या शासन निर्णयान्वये अनुदानास पात्र घोषित केले आहे.

३. शासन निर्णय दिनांक २६ सप्टेंबर, १९९५ मधील आदेशानुसार मंजूर केलेल्या वर नमूद तीन सैनिकी शाळेतील कायम विना अनुदान तत्वावर मंजूर केलेल्या १८ अतिरिक्त तुकडयांवरील ३६ शिक्षक पदांना अनुदान देण्यासाठी रु. ३०.४६ लक्ष इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यातील कायम विना अनुदान तत्वावर मान्यता दिलेल्या व कायम शब्द वगळलेल्या शासन मान्यता प्राप्त खाजगी प्राथमिक व माध्यमिक शाळांच्या मूल्यांकना संदर्भात निकष पूर्ण करणाऱ्या इयत्ता ५ वी ते १० वी च्या ६ अतिरिक्त तुकडया या प्रमाणे ३ सैनिक शाळांमधील एकूण १८ तुकडयांवरील ३६ शिक्षक पदांना २०% अनुदान मंजूर करण्यासाठी वित्त विभागाच्या आदेशानुसार रु. ३०.४६ लक्ष (रुपये तीस लाख शेचाळीस हजार फक्त) इतक्या निधीपैकी ७०% निधी म्हणजेच रु. २१.३२ लक्ष (रुपये एकवीस लाख बत्तीस हजार फक्त) इतका निधी सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात वितरीत करण्यास व खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरचा खर्च सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात "मागणी क्रमांक ई-२, २२०२- (००)(०३) सैनिक शाळांना सहाय्यक अनुदान, ३६ सहाय्यक अनुदाने (वेतन), (२२०२ ०५०२) या लेखाशीर्षातून खर्ची टाकण्यात येईल. सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "नियंत्रक अधिकारी" तसेच सहाय्यक संचालक (लेखा), माध्यमिक व उच्च माध्यमिक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना "आहरण व संवितरण अधिकारी" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.७७८/२०१८/व्यय ५, दिनांक ३.१०.२०१८ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०१८१०१९११३६१३५७२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swati
Madhukar
Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra,
ou=School Education And Sports Department,
postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4,
serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a,
cn=Swati Madhukar Nanal
Date: 2018.10.19 11:41:37 +05'30'

**( स्वाती म. नानल )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,

२) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य,

३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी,
६) मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई
७) मा.प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक,
८) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे,
९) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) म. रा. पुणे,
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
११) महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१२) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१३) स्थानिक निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१४) विभागीय शिक्षण उपसंचालक, अमरावती
१५) शिक्षणाधिकारी (माध्यमिक) जिल्हा परिषद, वाशिम /यवतमाळ / बुलढाणा
१६) वित्त विभाग कार्यासन (व्यय ५) / नियोजन विभाग (कार्या.नियोजन १४७१) मंत्रालय, मुंबई
१७) निवडनस्ती.